श्यामाप्रसाद मुखर्जी रुरबन मिशन करीता
Single Nodal Agency व Nodal
Officer ची नियुक्ती करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** रुरबन-२०२१/प्र.क्र.३६/योजना-१
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई -४०० ००१.
तारीख: २३ सप्टेंबर, २०२१

**वाचा -**

१) ग्रा.वि. वि., शासन निर्णय क्रमांक: एनआरएम-२०१६/प्र.क्र. ०१/योजना-४, दि. १४.०१.२०१६.
२) भारत सरकार यांच्या वित्त मंत्रालयाचे कार्यालयीन ज्ञापन: F.NO.१(१३)PFMS/FCD/२०२०, दि. २३.०३.२०२१.
३) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि .०१.०७.२०२१.

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे प्रभावी व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रीयेत परिमाणकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने त्यांचे दिनांक २३.०३.२०२१ च्या ज्ञापना अन्वये दिनांक ०१.०७.२०२१ पासून सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत.

याअनुषंगाने वित्त विभागाने संदर्भ क्र.३ च्या परिपत्रकान्वये केंद्र शासनाच्या सुधारित कार्यपध्दतीनुसार प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी Single Nodal Agency ची नेमणूक करावी व त्यासोबतच योजनेच्या समन्वयाच्या दृष्टीने सहसचिव दर्जाच्या अधिकाऱ्याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करावी, असे निर्देश दिलेले आहेत.

याअनुषंगाने श्यामाप्रसाद मुखर्जी रुरबन मिशन ही ६०:४० (केंद्र हिस्सा ६० % व राज्य हिस्सा ४०%) अशी केंद्र पुरस्कृत योजना आहे. श्यामाप्रसाद मुखर्जी रुरबन मिशन या अभियानाची अंमलबजावणी करण्यासाठी उप संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष रुरबन, बलार्ड इस्टेट, मुंबई, यांना Single Nodal Agency व सहसचिव (केंद्रीय योजना ) ग्राम विकास विभाग यांना Nodal Officer म्हणुन नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

श्यामाप्रसाद मुखर्जी रुरबन मिशन या अभियानाची अंमलबजावणी करण्याकरीता उप संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष रुरबन, बलार्ड इस्टेट, मुंबई यांना Single Nodal Agency व सहसचिव (केंद्रीय योजना) ग्राम विकास विभाग यांना State Nodal Officer म्हणुन नियुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२३१५३३२४२९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ghansham Jibhau Jadhav

Digitally signed by Ghansham Jibhau Jadhav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=914f966ddb6386e4d7e8470d42c78cce723425cbba133d00e6872290d2d49ef0, serialNumber=c8e8dc20f7ed71575c1b77071ac41ad68149b2c52d376aa00fd9b96da46fc1f8, cn=Ghansham Jibhau Jadhav
Date: 2021.09.28 13:02:05 +05'30'

( घ.जि.जाधव )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
२. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, (सर्व)
५. जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर वगळून), (सर्व).
६. मु.का.अ., जि.प.तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,(सर्व).
७. उप सचिव तथा वित्तीय नियंत्रक, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उप संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, २रा मजला, ठाकरसी हाउस, मुंबई पोर्ट ट्रस्ट, शूरजी वल्लभदास मार्ग,बलार्ड इस्टेट, मुंबई- ४०० ००१
९. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
१०. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. अतिरिक्त संचालक,प्रकल्प आखणी व एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष.
१२. कक्ष अधिकारी (वित्त-१), ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान रोड,मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१४. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई
१५. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७/कोषा-प्रशा-४), मंत्रालय, मुंबई
१६. नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती, कार्यासन योजना-१